**वाशिम येथे नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी तिसऱ्या व अंतिम हप्त्याचे अर्थसहाय्य वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. नागृबा २०१२/प्र.क्र.३७/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि. २८ जून, २०१७

वाचा : १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य व विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा २०१२/प्र.क्र.३७/सां.का.१, दि.७ नोव्हेंबर, २०१२ व दि.२४ सप्टेंबर, २०१५.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य व विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा २०१५/प्र.क्र.८५/सां.का.१, दि.२९ फेब्रुवारी, २०१६.
३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य व विभाग, शासन निर्णय क्र.नागृबा २०१२/प्र.क्र.३७/सां.का.१, दि.३१ डिसेंबर, २०१६.
४) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (नियोजन), वाशिम यांचे पत्र क्र.नियोजन/कक्ष-१५/सांस/५८५/१७, दि. -/०५/२०१७.
५) मुख्याधिकारी, नगरपरिषद, वाशिम यांचे पत्र क्र.नपवा/कार्या-१७/नाटयगृह बांध/ ३८७/२०१७, दि.१५.०५.२०१७.

**प्रस्तावना** :

जिल्हा मुख्यालयी नाटयगृह बांधकाम करण्यासाठी निधी मंजूर करण्याच्या विभागाच्या योजनेनुसार संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये, वाशिम येथे नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी तिसऱ्या व अंतिम हप्त्याचे अर्थसहाय्य रु.३८,००,०००/- वितरीत करण्यात आले. तदनुषंगाने संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (नियोजन), वाशिम यांनी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत रु.३८ लक्ष निधी जिल्हाधिकारी कार्यालयास प्राप्त झाला नसल्यामुळे सदर निधी आहरीत करण्यात आलेला नसल्याचे कळविले आहे. तद्नुषंगाने संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय रद्द करून चालू आर्थिक वर्ष सन २०१७-१८ मध्ये सदर नाटयगृहास तिसऱ्या व अंतिम हप्त्यापोटी देय रु.३८ लक्ष वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

विचारांती संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत असून या शासन निर्णयान्वये वाशिम येथे नाटयगृह इमारतीचे बांधकामासाठी शासकीय अर्थसहाय्याच्या १०% एवढया तिसऱ्या व अंतिम हप्त्याची रक्कम रु.३८,००,०००/- (रुपये अडतीस लक्ष फक्त) वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

१) शासन निर्णय दि.७ नोव्हेंबर, २०१२ अन्वये विहित केलेल्या सर्व अटी व शर्तींचे पालन करणे नगर परिषद, वाशिम व जिल्हाधिकारी, वाशिम यांना बंधनकारक राहिल.

२) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या तिसऱ्या हप्त्याची अर्थसहाय्याची रक्कम रु.३८.०० लक्ष खर्च केल्याचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र तसेच कामाचे भौतिक साध्य याबाबतची माहिती सादर करणे बंधनकारक राहील.

३) निधी वितरण व खर्च याबाबतचा अनुपालन अहवाल जिल्हाधिकारी, वाशिम यांनी शासनास पाठवावा.

२. जिल्हाधिकारी, वाशिम यासाठी नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पिय वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक क्रमांक २०१७०६२८११०९५८०४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Vasant Kadam
Date: 2017.06.29 10:58:04 +05'30'

(वि.व. कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम
६) मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद, वाशिम.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक / दोन महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
९) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) वित्त विभाग (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई.
११) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - अर्थसंकल्प शाखेने सदर रक्कम अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे वितरीत करावी.
१३) निवड नस्ती, सां.का.१.